**मा. अध्यक्ष,राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली यांचे माहे डिसेंबर, २०२३ ते फेब्रुवारी, २०२४ या कालावधीचे वाहन व्यवस्थेवरील इंधन खर्चाचे देयक रु.२,०५,३३८/- ला मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३/प्र.क्र.२०३/मावक**
मोती महल, २ रा मजला, १९५, जे टाटा रोड,
चर्चगेट, मुंबई- ४०० ०२०
दिनांक : २७ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२/मावक, दि.१६ फेब्रुवारी, २०२३

२. जिल्हाधिकारी चंद्रपूर यांचे कार्यालयाचे पत्र क्र. क्र.मशा/कार्या-२/लेखा-टे-३/२०२४/३२२, दि.०४.०१.२०२४.

३. जिल्हाधिकारी चंद्रपूर यांचे कार्यालयाचे पत्र क्र.मशा/कार्या-२/लेखा-टे-३/२०२४/४७२, दि.०८.०२.२०२४.

४. जिल्हाधिकारी चंद्रपूर यांचे कार्यालयाचे पत्र क्र.मशा/कार्या-२/लेखा-टे-३/२०२४/५१०, दि.०७.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

भारत सरकारने मागासवर्गीयांच्या योजन प्रभावीपणे राबविणे, त्यांचेवर नियंत्रण ठेवणेसाठी राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली गठीत केला आहे. या आयोगावर अध्यक्ष, सदस्य आणि सदस्य सचिवांची नियुक्ती करण्यात आली आहे. आयोगाचे कामकाज अधिक परिणामकारकरित्या होण्यासाठी आयोगाचे अध्यक्ष, सदस्य आणि सदस्य सचिव यांना शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सीबीसी-१२/२०१२/प्र.क्र.१२०/मावक, दि.१६.०८.२०१२ अन्वये राज्य अतिथी म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली यांचे अध्यक्ष , सदस्य आणि सदस्य सचिव हे ज्या ज्या वेळी कार्यालयीन दौऱ्यावर महाराष्ट्र राज्यात येतील त्यावेळी त्यांना राज्य आतिथी म्हणून त्यांना त्यांच्या दर्जानुसार खालील अटीच्या अधीन राहून सूविधा पुरविण्यात आल्या आहेत.

(१) राजशिष्टाचार, वाहन, निवास तथा भोजनाची सुविधा फक्त कार्यालयीन दौऱ्यात उपलब्ध राहील.

(२) या सुविधा कमाल तीन दिवसांसाठी उपलब्ध राहतील.

२. मा. अध्यक्ष, राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली यांचे माहे डिसेंबर, २०२३ ते फेब्रुवारी, २०२४ या कालावधीतील खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या वाहन व्यवस्थेवरील इंधन खर्चाचे एकूण देयक रु.२,०५,३३८/- ला मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

| अ.क्र. | महिना | जिल्हाधिकारी, चंद्रपूर कार्यालयाचे पत्र क्रमांक व दिनांक | देयकाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | डिसेंबर, २०२३ | पत्र क्र.मशा/कार्या-२/लेखा-टे-३/२०२४/३२२, दि.०४.०१.२०२४ | ५४,५६९/- |
| २. | जानेवारी, २०२४ | पत्र क्र.मशा/कार्या-२/लेखा-टे-३/२०२४/४७२, दि.०८.०२.२०२४ | ७०,४१५/- |
| ३. | फेब्रुवारी, २०२४ | पत्र क्र.मशा/कार्या-२/लेखा-टे-३/२०२४/५१०, दि.०७.०३.२०२४ | ८०,३५४/- |
| | | **एकूण** | २,०५,३३८/- |

**शासन निर्णय :-**

मा. अध्यक्ष, राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली यांचे माहे डिसेंबर, २०२३ ते फेब्रुवारी, २०२४ या कालावधीतील वाहन व्यवस्थेवरील इंधन खर्चाचे एकूण देयक रु.२,०५,३३८/- (रुपये दोन लक्ष पाच हजार तीनशे अडतीस फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवर होणारा खर्च महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग,पुणे यांना खालील लेखाशिर्षातून भागविण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

"मागणी क्र. झेडजी-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण (०१) (०२) राज्य मागासवर्ग आयोग (अनिवार्य) (२२५एफ३५२) १३, कार्यालयीन खर्च "

३. सदर लेखाशिर्षातील उक्त बाबीच्या अनुषंगाने उपलब्ध करुन दिलेला निधी वितरीत करण्यासाठी सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. सदर देयकाची पूर्तता निवासी उपजिल्हाधिकारी, चंद्रपूर यांना करण्यात यावी.

४. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२७१७२९०३९२३४ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH SHRIDHAR DHAWLE

Digitally signed by PRAKASH SHRIDHAR DHAWLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=eadb2369514cf114fb080a75acc2ae8dcf8591b733bb6f63612246049721dfca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60C3A22DD966735D3A1B24AA927CFEE6BED87B4A378083D720DF90D57B2125D8, cn=PRAKASH SHRIDHAR DHAWLE
Date: 2024.03.27 17:39:06 +05'30'

**(प्रकाश श्री. धावले)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
२. जिल्हाधिकारी, चंद्रपूर
३. वरीष्ठ कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, चंद्रपूर.
४. सदस्य सचिव,महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे.
५. संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे
६. निवड नस्ती (मावक)